**कै.श्री.अनुप धनवे, जे.एच.ड्रीलर , यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परिषद,बीड यांचा सेवाबाह्य कालावधी कालबध्द पदोन्नती व निवृत्तीवेतनासाठी ग्राह्य धरण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना २०१६/प्र.क्र.२७२/ पापु १५

७वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॅाफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४००००१
तारीख: २९ एप्रिल,२०१७

वाचा

1. **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्रमांकः जा.क्र./काअग्रा/भूसविय/आस्था ००२३०९/२०१४ दिनांक २४ सप्टेंबर,२०१४**
2. **मा.कामगार न्यायालय येथील दावा क्र. आयडिऐ -५१/८७ प्रकरणी पारीत केलेले आदेश दिनांक २५.०९.१९९१**
3. **कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्रमांक ग्रापापुवि/अस्था-२/कावि१२४/०००४१७/२०१७ दिनांक ८ मार्च,२०१७**

प्रस्तावना:-

कै.श्री.अनुप धनवे , जे.एच.ड्रीलर, यांत्रिकी उप विभाग जिल्हा परिषद, बीड यांचा दिनांक ७.१.१९८३ ते १०.०८.१९९२ हा सेवाबाह्य कालावधी नियमित करणे, कालबध्द पदोन्नती व निवृत्तीवेतनासाठी ग्राह्य धरणे याकरीताचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी संदर्भ.क्र.१ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. कै.श्री.अनुप धनवे यांनी समाधानकारक काम न केल्यामुळे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी त्यांची सेवा दि.११.०१.१९८३ चे आदेशान्वये दि.०७.०१.१९८३ पासून समाप्त केली होती. याविरोधात कै.श्री.अनुप धनवे यांनी मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे आय.डि.ए. ५१/८७ खाली याचिका दाखल केली होती. सदर याचिकेवर दि.२५.०९.१९९१ रोजी निकाल दिला गेला व त्यात कै.श्री.धनवे यांना जे.एच.ड्रीलर पदावर पुन:स्थापित करण्याचे मा.कामगार न्यायालयाने आदेश दिले. मा. कामगार न्यायालयाने दिलेल्या आदेशात कै.श्री.धनवे यांचे उपरोक्त सेवा बाह्य कालावधीतील वेतन व भत्ते मा.न्यायालयाने अनुज्ञेय केलेले नाहीत; तथापि सदर कालावधी ज्येष्ठतेसाठी व निवृत्तीवेतनाच्या प्रयोजनासाठी अर्हताकारी सेवा म्हणून ग्राह्य धरण्याविषयी आदेश दिले आहेत. कै.श्री.अनुप धनवे हे दि.०४.०९.२०१३ रोजी मयत झाले. त्यानंतर त्यांचे मूळ सेवा पुस्तक लेखाधिकारी वेतनपडताळणी पथक, औरंगाबाद यांना वेतन पडताळणीसाठी सादर केले असता लेखाधिकारी यांनी दि.०७.०१.१९८३ ते १०.०८.१९९२ हा सेवाबाह्य कालावधी पदोन्नतीसाठी ग्राह्य धरावा किंवा कसे , तसेच वेतनासाठी ग्राह्य धरणेबाबत शासनाकडून आदेश प्राप्त करुन घेणे क्रमप्राप्त आहे असा आक्षेप नोंदवून मूळ सेवा पुस्तक परत केल्याने कै.श्री.धनवे यांचे सेवाबाह्य कालावधी प्रकरणी शासनाचे आदेश होण्याची विनंती मुख्य कार्याकारी अधिकारी यांनी संदर्भ.क्र.१ येथील पत्रान्वये शासनास केली आहे.

**शासन आदेश:-**

कै.श्री.अनुप धनवे यांनी मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे आयडिए -५१/८७ खाली दाखल केलेल्या याचिके प्रकरणी मा.कामगार न्यायालयाने दि.२५.०९.१९९१ रोजी निकाल दिला व कै.श्री.अनुप धनवे यांचा सेवाबाह्य कालावधी कोणतेही वेतन व भत्ते अनुज्ञेय न करता सेवाज्येष्ठता व निवृत्तीवेतनाच्या प्रयोजनासाठी अर्हताकारी सेवा म्हणून ग्राह्य धरण्याविषयी आदेश दिले आहेत. कै.श्री.अनुप धनवे यांची शासन सेवेतील नियुक्ती सेवा प्रवेश नियमानुसार विहीत भरती यंत्रणेमार्फत झाली असल्याचे, तसेच त्यांचे सेवाबाह्य कालावधी विचारात घेता ते निवृत्तीवेतनासाठी पात्र ठरत असल्याचे कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद,बीड यांनी संदर्भ.क्र.३ येथील पत्रान्वये प्रमाणित केले आहे. कै.श्री.अनुप धनवे यांचेबाबत स्थायी कर्मचारी म्हणून आदेश निर्गमित आहेत, तसेच त्यांचे सेवाशर्ती म.ना.से. नियमानुसार विनियमित झाले असल्याचे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, बीड यांनी शासनास कळविले आहे. यास्तव याप्रकरणी शासन असा आदेश देते की. कै.श्री.अनुप धनवे, जे.एच.ड्रीलर, यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परिषद, बीड यांचे प्रकरणी मा.कामगार न्यायालयाने पारीत केलेल्या संदर्भ.क्र.२ येथील आदेशानुसार त्यांचा सेवाबाह्य कालावधी कोणतेही वेतन व भत्त्याचे लाभ अनुज्ञेय न करता सेवाज्येष्ठता, कालबध्द पदोन्नती व निवृत्तीवेतनाच्या प्रयोजनाकरीता अर्हताकारी सेवा म्हणून ग्राह्य धरण्यात यावा.

याप्रकरणी शासन असेही आदेश देत आहे की, कै.श्री.अनुप धनवे यांचे मूळ सेवा पुस्तक निवृत्तीवेतन विषयक लाभ प्रदान करण्याकरीता तात्काळ वेतन पडताळणी पथक औरंगाबाद यांचेकडे सादर करण्यात यावे.

उपरोक्त शासन आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ.क्र.६१६/१६ सेवा-३ दि.१९.११.२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीच्या अनुषंगाने अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२९१०४६३१७५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirti Bhargav Mohite

Digitally signed by Kirti Bhargav Mohite
DN: CN = Kirti Bhargav Mohite, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply And Sanitation Department
Date: 2017.04.29 14:50:18 +05'30'

**(कीर्ती मोहिते)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
४. श्रीमती शिवकन्या अनुप धनवे,बीड.
५. निवडनस्ती (पापु १५)